**<u>पनवेल महानगरपालिकेमध्ये समाविष्ट करण्यात आलेल्या २३ ग्रामपंचायती मधील कर्मचाऱ्यांना पनवेल महानगरपालिकेमध्ये समावेशन करण्याबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः- पमपा-२२१७/प्र.क्र.४१२ (ब)/नवि-२३**
मंत्रालय (मुख्य इमारत), ४ था मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई-३२.
दिनांक:- २३ नोव्हेंबर, २०२०

<u>वाचा:-</u>

१) शासन निर्णय अधिसूचना क्रमांक पनपा-२९१४/व्हीआयपीस.क्र.३०१/प्र.क्र.३५४/नवि-२३, दिनांक २६.०९.२०१६
२) शासन निर्णय क्र. एमसीओ-२०१७/प्र.क्र.५७/नवि-१४, दिनांक २७.०२.२०१७
३) नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांचा दिनांक २८.०५.२०१९ व दिनांक २१.०८.२०१९, दिनांक ०५.१०.२०१९ व दिनांक ३१.०८.२०२० चा अहवाल
४) नगर विकास विभागाचा शासन निर्णय क्रमांक पमपा-२२१७/प्र.क्र.४१२/नवि-२३, दिनांक २३.११.२०२०

**<u>प्रस्तावना</u>:-**

पनवेल महानगरपालिकेची स्थापना दिनांक ०१.१०.२०१६ रोजी झाली असून, सदर महानगरपालिका ही “ड” वर्ग महानगरपालिका आहे. सद्य:स्थितीत महानगरपालिकेचे ४ प्रभाग असून, एकूण क्षेत्रफळ ११०.६ चौ.कि.मी. एवढे आहे. सन-२०११ च्या जनगणनेनुसार पनवेल महानगरपालिकेची लोकसंख्या ६ लाख इतकी असून, तरंगती लोकसंख्या १३ लाख इतकी आहे.

२. पनवेल महानगरपालिकेमध्ये समावेशन करावयाच्या पुर्वाश्रमीच्या ग्रामपंचायत कर्मचाऱ्यांबाबत अनेक अडचणी उपस्थित झाल्यामुळे ग्रामपंचायमधील कर्मचाऱ्यांना पनवेल महानगरपालिकेमध्ये समाविष्ठ करण्याठी शासन स्तरावर विभागीय आयुक्त, कोकण विभाग यांच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन करण्यात आली. सदर समितीची बैठक दिनांक २२.०१.२०१९ रोजी पार पडली असून या बैठकीचे निर्णय आयुक्त, पनवेल महानगरपालिका यांनी दिनांक २५.०१.२०१९ च्या पत्रान्वये सादर केले आहे.

३. विभागीय आयुक्त, कोकण विभाग यांच्या अहवालाच्या अनुषंगाने आयुक्त तथा संचालक नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांनी शासनाने सूचित केल्यानुसार संदर्भीय क्र. ३, अन्वये शासनास अहवाल सादर केला. तसेच महानगरपालिकेमध्ये समाविष्ठ तत्कालीन ग्रामपंचायतील कर्मचाऱ्यांची शैक्षणिक / तांत्रिक अर्हतेची पुर्तता नसणे, नवनिर्मित महानगरपालिकेचे आकृतीबंधाचे काम अद्यापी शासन स्तरावर सुरू असणे, इतर बाबी विचारात घेऊन तसेच पनवेल महानगरपालिकेची लोकसंख्या, वाढते नागरीकरण, दैनंदिन कामकाज याकरीता आवश्यक शैक्षणिक / तांत्रिक अर्हता या सर्वबाबींवर वेळोवेळी शासन स्तरावर विचार विनिमय करण्यात आलेला आहे.

४. महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, परिशिष्ट-४, नियम-५ (क) अन्वये पनवेल महानगरपालिकेमध्ये समाविष्ट करावयाच्या महसुली गावांमधील ग्रामपंचायतींच्या आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांच्या सेवा महानगरपालिकेच्या आस्थापनेवर समाविष्ट करणे आवश्यक आहे. त्यानुसार संदर्भाधीन क्र. ४ अन्वये समावेशन टप्पा क्र. १ मध्ये महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ५१ (४) नुसार पनवेल महानगरपालिकेच्या आस्थापनेवर तत्कालीन ग्रामपंचायतीमधील ३२० कर्मचाऱ्यांपैकी एकूण १०५ कर्मचाऱ्यांचे समावेशन करण्यास मंजुरी प्रदान करण्यात आली. तथापि, आता उर्वरीत कर्मचाऱ्यांपैकी समावेशनास पात्र असणाऱ्या कर्मचाऱ्यांचे पनवेल महानगरपालिकेमध्ये समावेशन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णयः-

पनवेल महानगरपालिकेमध्ये समाविष्ट झालेल्या तत्कालीन २३ ग्रामपंचायतीमधील सद्यस्थितीमध्ये एकूण **१८३ कर्मचारी** द्वितीय टप्प्यातील समावेशनास पात्र झाले आहेत. सदर समावेशनास पात्र असलेले कर्मचाऱ्यांची यादी **"परिशिष्ट-अ"** मध्ये नमुद केली आहे. तसेच **"परिशिष्ट-ब"** मध्ये समावेशनास पात्र असलेल्या कर्मचाऱ्यांकडून घ्यावयाचा हमीपत्राचा नमुना दिला आहे.

२. पनवेल महानगरपालिकेमध्ये समाविष्ट झालेल्या तत्कालीन ग्रामपंचायती मधील कर्मचाऱ्यांना पनवेल महानगरपालिकेमध्ये समावेशन पुढील अटी व शर्तींच्या अधीन राहून निर्माण करण्यात येत आहे:-

१) संबधित कर्मचाऱ्यांची मुळ नियुक्ती प्रचलित नियमानुसार व पनवेल महानगरपालिकेच्या निर्मितीच्या प्राथमिक अधिसूचनेच्या दिनांकापूर्वीची असावी. प्रत्यक्ष समावेशन करताना संबंधित कर्मचाऱ्यांचे मुळ नियुक्ती व कायम करण्याचे ठराव, नियुक्ती आदेश, सेवा पुस्तक, वेतनप्रमाणपत्र/वेतन खात्याचे बँक पासबुक इ. तपशिल आयुक्त, पनवेल महानगरपालिका यांनी तपासावा.

२) पनवेल महानगरपालिकेच्या आकृतीबंध व सेवाप्रवेश नियमास शासनाची मान्यता प्राप्त झाल्यानंतर पदनिर्मितीच्या दिनांकापासून संबंधित कर्मचाऱ्यांचे समावेशन करण्यात येईल व त्यांना नियमित वेतनश्रेणीत सामावून घेण्यात येईल.

३) संबंधित कर्मचाऱ्यांना वेतनश्रेणीनुसार वेतन भत्ते व सेवाविषयक लाभ हे प्रत्यक्ष समावेशनाच्या दिनांकापासून लागु होतील.

४) संबंधित ग्रामपंचायतीच्या कर्मचाऱ्यांचे समावेशन करताना संबंधित कर्मचाऱ्यांची शैक्षणिक / तांत्रिक अर्हता विचारात घ्यावी. प्रत्यक्ष समावेशनाच्या प्रक्रियेत सदर कर्मचाऱ्यांची शैक्षणिक / तांत्रिक अर्हता तपासण्याची जबाबदारी आयुक्त, पनवेल महानगरपालिका यांची राहील.

५) शासनाच्या प्रचलित धोरणानुसार मान्य असलेली शैक्षणिक / तांत्रिक अर्हता विचारात घेतल्यानंतर संबंधित कर्मचाऱ्यांचे समावेशन आदेश पारित करताना केवळ पात्र कर्मचाऱ्यांना वर्ग-३ / वर्ग-४ मधील पदावर समावेशन करावे.

६) पनवेल महानगरपालिकेमध्ये संबंधित ग्रामपंचायतीच्या कर्मचाऱ्यांचे समावेशन करताना लिपीक या पदासाठी किमान शैक्षणिक अर्हता १० वी पास अशी असावी. तसेच पूर्वाश्रमीच्या सफाई कामगारांची शैक्षणिक अर्हता किमान ४ थी उत्तीर्ण आहे, अशा कर्मचाऱ्यांचा समावेश करताना त्यांना सफाई कामगार संवर्गात ग्राह्य धरण्यात यावे.

तथापि, या व्यतिरीक्त शैक्षणिक / तांत्रिक अर्हता धारण न करणारे कर्मचारी परंतू किमान ४ थी पास व मराठी लिहिता व वाचता येणारे असे कर्मचारी "बहुउद्देशीय कर्मचारी" या संवर्गामध्ये समाविष्ट करण्यात यावे.

तथापि, शैक्षणिक अर्हता धारण न करणाऱ्या कर्मचाऱ्यांना विशेष बाब म्हणुन "बहुउद्देशीय कर्मचारी" वर्गात समाविष्ट करण्यात यावे.

७) उपरोक्त नमुद करण्यात आलेल्या बहुउद्देशीय कर्मचारी संवर्गामधील समाविष्ट कर्मचाऱ्यांच्या सेवा, नियत वयोमानानुसार सेवानिवृत्ती / स्वेच्छा सेवा निवृत्ती / अकाली मृत्यू / बडतर्फी/ सेवा समाप्ती या कारणास्तव संपुष्ठात आल्यास सदरचे पद आपोआप व्यपगत करण्यात येईल.

८) पुर्वाश्रमीच्या पनवेल नगरपरिषद व विद्यमान महानगरपालिकेतील कर्मचारी यांच्या सेवा जेष्ठता यादीमध्ये, ग्रामपंचायती मधील समावेशनास पात्र कर्मचाऱ्यांची समायोजनानंतर संबंधित संवर्गातील "सेवा जेष्ठता" ही कनिष्ठतम राहिल.

९) तसेच उपरोक्त कर्मचाऱ्यांच्या समावेशनानंतर संबंधित संवर्गातील पात्र कर्मचाऱ्यांना महानगरपालिकेतील त्या संवर्गाच्या बिंदुनामावलीमधील नियमाप्रमाणे त्यांच्या जातीच्या प्रवर्गानुसार दर्शविण्यात यावे व बिंदुनामावली तपासणीची कार्यवाही पनवेल महानगरपालिकेने करावी.

१०) महाराष्ट्र शासनाने शासकीय कर्मचाऱ्यांसाठी दिनांक ०१.१०.२००५ नंतर नियुक्त कर्मचाऱ्यांना परिभाषित निवृत्तीवेतन अंशदान (DCPS) योजना लागू केली आहे. पनवेल महानगरपालिकेत समावेशनासाठी पात्र असलेल्या कर्मचाऱ्यांना पुर्वाश्रमीची सेवा निवृत्ती योजना लागू राहणार नाही.

११) पनवेल महानगरपालिकेमध्ये ग्रामपंचायतीच्या कर्मचाऱ्यांच्या समावेशनानंतर पनवेल महानगरपालिकेतील स्थायी/ अस्थायी आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांप्रमाणे गटविमा योजना / वैद्यकीय विमा अथवा वैद्यकीय देयक प्रतीपूर्ती करण्याची योजना रजा नियम लागु राहतील.

१२) तथापि, दिनांक ०१.१०.२०१६ नंतर सदर कर्मचाऱ्यांचे समावेशन होत असल्याने त्यांना परिभाषित निवृत्तीवेतन अंशदान (DCPS) योजनचे सदस्य होणे अनिवार्य असेल.

१३) सदर कर्मचाऱ्यांना समावेशनानंतर पनवेल महानगरपालिकेच्या स्थायी / अस्थायी आस्थापनेवरील कार्यरत कर्मचाऱ्यांप्रमाणे नव्याने समायोजीत झालेल्या कर्मचाऱ्यांना स्थायी आदेश मिळाल्यानंतर नियमानुसार अनुकंपातत्वावर नेमणुकीसंदर्भातील नियम लागु राहतील.

१४) सफाई कर्मचाऱ्यांपैकी केवळ "अनुसूचित जाती" प्रवर्गातील सफाई कर्मचारी लाड-पागे समितीच्या शिफारशीनुसार वारसा हक्काने नोकरी मिळण्यास पात्र आहेत. तसेच केवळ "अनुसूचित जाती" प्रवर्गातील कर्मचाऱ्यास त्यांच्या सेवानिवृत्ती/मृत्यू/रुग्णता सेवानिवृत्तीनंतर त्यांच्या वारसास लाड व पागे समितीच्या शिफारशीनुसार सेवेत सामावुन घेण्याबाबत कार्यवाही महानगरपालिकेने वेळोवेळी करावी.

१५) पनवेल महानगरपालिकेत समावेशनासाठी पात्र असलेल्या संबंधित कर्मचाऱ्यांकडून **"परिशिष्ट-ब"** मधील हमीपत्र पनवेल महानगरपालिकेने भरुन घ्यावे. सदर हमीपत्र म्हणजेच संबंधित कर्मचाऱ्याचे ना-हरकत प्रमाणपत्र होय.

१६) पनवेल महानगरपालिकेमध्ये समावेशनासाठीच्या पात्र असलेल्या ग्रामपंचायतीमधील कर्मचाऱ्यांच्या समावेशनासंदर्भात विहित तांत्रिक (MS-CIT, टंकलेखन) अर्हतेत सुट अथवा त्याबाबत प्रमाणपत्र सादर करण्यास कालावधीबाबत खालीलप्रमाणे अटी विहित करण्यात आल्या आहेत:-

पनवेल महानगरपालिकेमध्ये समावेशनासाठी पात्र असलेल्या ग्रामपंचायतीमधील कर्मचाऱ्यांच्या नियुक्तीसंदर्भात विहित शैक्षणिक अर्हता धारण करणाऱ्या कर्मचाऱ्यांपैकी जे कर्मचारी तांत्रिक अर्हता धारण करीत नसतील अशा कर्मचाऱ्यांपैकी

**अ)** ५० वर्षापेक्षा अधिक वय असणाऱ्या कर्मचाऱ्यांना समावेशनासाठी तांत्रिक अर्हतेमधून सूट देण्यात येत आहे.

**ब)** ५० वर्षापेक्षा कमी वय असणाऱ्या कर्मचाऱ्यांनी ३ वर्षाच्या कालावधीत तांत्रिक अर्हता प्राप्त करुन त्याबाबतची प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक असेल. या ३ वर्षाच्या कालावधीत संबंधित कर्मचाऱ्यांनी विहीत तांत्रिक अर्हतेबाबतची प्रमाणपत्र सादर न केल्यास, त्यांचे समावेशन रद्द करण्यात येईल.

१७) संबंधित सर्व कर्मचाऱ्यांचे प्रत्यक्ष समावेशन करताना उपरोक्त अटी, समोवशनाबाबतचे अहवाल व प्रचलित शासन धोरण/सेवानियम यांची परिपुर्ण पुर्तता करण्याची जबाबदारी आयुक्त, पनवेल महानगरपालिका यांची राहील.

३. आयुक्त, पनवेल महानगरपालिका यांनी **परिच्छेद क्र.२** मधील नमुद अटी व शर्ती बंधनकारक असून त्याचे पालन करूनच समावेशनाची प्रत्यक्ष कार्यवाही करण्यात यावी. यामध्ये प्रत्यक्ष अंमलबजावणी करताना कोणतीही अडचण निर्माण झाल्यास त्याबाबत शासनाचे मार्गदर्शन घेण्यात यावे व याबाबत शासनाचा निर्णय अंतिम राहिल.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०२०११२३१७२२०६५९२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shankar
Trambak Jadhav

Digitally signed by Shankar Trambak Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=65f3f4695111ee4b72455e21ef9099788d9b999ffbcaaa070711f14d2a10e138, serialNumber=c83ebbb277c2e72c85231b87f684c424a13c398a4f921b6d167a8c859e9817f5, cn=Shankar Trambak Jadhav
Date: 2020.11.23 17:29:04 +05'30'

**(शंकर जाधव)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**सोबत:- परिशिष्ट-"अ"** व **परिशिष्ट -"ब"**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, सी.बी.डी. बेलापूर, नवी मुंबई.
३) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय.
४) जिल्हाधिकारी, रायगड.
५) महापौर, पनवेल महानगरपालिका, जि.रायगड.
६) आयुक्त, पनवेल महानगरपालिका, जि.रायगड
७) प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहायक.
८) कार्यासन अधिकारी (नवि-१४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) निवड नस्ती (नवि-२३).

| परिशिष्ट - अ (टप्पा-२) | | | |
|---|---|---|---|
| अ.क्र | ग्रामपंचायतीचे नाव | कर्मचाऱ्याचे नाव | शैक्षणिक / तांत्रिक अर्हता विचारात घेऊन ज्या पदावर समावेशन मंजुर |
| १ | २ | ३ | ४ |
| १ | कामोठे | श्री.राहुल जगन्नाथ पाटील | बहुउद्देशीय कर्मचारी |
| २ | ओवे | श्री.गणेश नारायण वाघमारे | बहुउद्देशीय कर्मचारी |
| ३ | कालुद्रें | श्री. सोनवीर चंद्री चुनालिया | बहुउद्देशीय कर्मचारी |
| ४ | पेणधर | श्री. शाम बाळाजी जाधव | बहुउद्देशीय कर्मचारी |
| ५ | पेणधर | श्री. भारत शंकर भरभरा | बहुउद्देशीय कर्मचारी |
| ६ | पडघे | श्री. मोहन सुखदेव कांबळे | बहुउद्देशीय कर्मचारी |
| ७ | पडघे | श्री. हेमंत आंबो भगत | बहुउद्देशीय कर्मचारी |
| ८ | कळंबोली | श्री. मनोज रामफळ पिवाळ | बहुउद्देशीय कर्मचारी |
| ९ | कळंबोली | श्री. रामा धर्मा निरगुडा | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १० | कळंबोली | श्री. पदु हिरा गिरा | बहुउद्देशीय कर्मचारी |
| ११ | कळंबोली | श्री. राजु बामा पारधी | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १२ | कळंबोली | श्री. सुभाष सोमवार भगत | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १३ | कळंबोली | श्री. मारवती कृष्णा नाईक | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १४ | कळंबोली | श्री. रवि मधु नाईक | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १५ | खारघर | श्री. भगवान धर्मा पाटील | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १६ | खारघर | श्री. राजेंद्र वसंत गुजरे | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १७ | खारघर | श्री. बाबु गोविंद नाईक | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १८ | खारघर | श्री. हिरा गणा मधे | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १९ | खारघर | श्री. शनवार भुऱ्या सफरा | बहुउद्देशीय कर्मचारी |
| २० | खारघर | श्री. जयराम भुऱ्या सफरा | बहुउद्देशीय कर्मचारी |
| २१ | खारघर | श्री. रघुनाथ सावळाराम बारशे | बहुउद्देशीय कर्मचारी |
| २२ | खारघर | श्री. रविंद्र कमलाकर पाटिल | बहुउद्देशीय कर्मचारी |
| २३ | खारघर | श्री. भुऱ्या शनिवार पारधी | बहुउद्देशीय कर्मचारी |
| २४ | नावडे | श्रीम. मालवनी मौला शेख | बहुउद्देशीय कर्मचारी |
| २५ | नावडे | श्रीम. गोरिमा बाबु शेख | बहुउद्देशीय कर्मचारी |
| २६ | कामोठे | श्री. श्याम प्रभाकर सुर्ते | बहुउद्देशीय कर्मचारी |
| २७ | कामोठे | श्री. भालचंद्र बबन मुंडकर | बहुउद्देशीय कर्मचारी |
| २८ | कामोठे | श्री. श्रीपत बेमट्या नाईक | बहुउद्देशीय कर्मचारी |
| २९ | घोटचाळ | श्री. दिनकर बळिराम ठोंबरे | बहुउद्देशीय कर्मचारी |
| ३० | घोटचाळ | श्रीम. विजया महादु जाधव | बहुउद्देशीय कर्मचारी |

| अ.क्र | ग्रामपंचायतीचे नाव | कर्मचाऱ्याचे नाव | शैक्षणिक / तांत्रिक अर्हता विचारात घेऊन ज्या पदावर समावेशन मंजुर |
|---|---|---|---|
| ३१ | घोटचाळ | श्रीम. सुनिता प्रकाश चव्हाण | बहुउद्देशीय कर्मचारी |
| ३२ | घोटचाळ | श्रीम. मुक्ताबाई बाळकृष्ण भोईर | बहुउद्देशीय कर्मचारी |
| ३३ | घोटचाळ | श्रीम. मंगळाबाई लहु पाटिल | बहुउद्देशीय कर्मचारी |
| ३४ | घोटचाळ | श्री. दत्तु देहु पारठे | बहुउद्देशीय कर्मचारी |
| ३५ | घोटचाळ | श्री. गोपीनाथ शंकर ढोंगरे | बहुउद्देशीय कर्मचारी |
| ३६ | पालेखुर्द | श्री. बाबुराव कान्हा पालकर | बहुउद्देशीय कर्मचारी |
| ३७ | पडघे | सौ. गोमुबाई लक्ष्मण सोनावणे | बहुउद्देशीय कर्मचारी |
| ३८ | कळंबोली | श्री. प्रकाश महादु चौधरी | बहुउद्देशीय कर्मचारी |
| ३९ | नावडे | अशोक लक्ष्मण गाडे | बहुउद्देशीय कर्मचारी |
| ४० | ओवे | श्रीम. कमळीबाई सदु ठाकुर | बहुउद्देशीय कर्मचारी |
| ४१ | कोयनावेल | श्रीम.सीमा विष्णु कदम | शिपाई |
| ४२ | रोहिंजन | श्री. विश्राम अभिमन्यु म्हात्रे | लिपीक |
| ४३ | कामोठे | श्रीमती.श्रध्दा शंकर भगत | लिपीक |
| ४४ | खारघर | श्री. प्रतिक वामन म्हात्रे | लिपीक |
| ४५ | कळंबोली | श्री. कल्पेश नामदेव जळे | लिपीक |
| ४६ | कळंबोली | श्रीमती. रूपाली नारायण चौधरी | लिपीक |
| ४७ | कामोठे | श्री. उमेश परशुराम मढवी | लिपीक |
| ४८ | कामोठे | श्री. निलेश नागनाथ म्हात्रे | लिपीक |
| ४९ | ओवे | श्री. प्रफुल प्रभाकर घरत | लिपीक |
| ५० | तलोजा पाचनंद | श्री. योगेश प्रकाश केणी | लिपीक |
| ५१ | नावडे विभाग | श्रीमती. नेहा महेंद्र पाटील | लिपीक |
| ५२ | कळंबोली | श्री. आकाश अनंत पाटील | लिपीक |
| ५३ | कळंबोली | श्री. विवेक भरत जळे | लिपीक |
| ५४ | कळंबोली | श्री. रोशन दत्तात्रेय पोपेटा | लिपीक |
| ५५ | कामोठे | श्री. जयेश रविद्र पाटील | लिपीक |
| ५६ | कामोठे | श्री. दत्तगुरू आप्पा म्हात्रे | लिपीक |
| ५७ | खारघर | श्री. समीर बबन ठाकूर | लिपीक |
| ५८ | रोडपाली विभाग | श्रीमती. शुभांगी उमेश पांगारे | लिपीक |
| ५९ | कालुद्रें | श्री. दिनेश रमेश भोसले | लिपीक |
| ६० | पेणधर | श्री. रोशन रमाकांत माळी | लिपीक |

| अ.क्र | ग्रामपंचायतीचे नाव | कर्मचाऱ्याचे नाव | शैक्षणिक / तांत्रिक अर्हता विचारात घेऊन ज्या पदावर समावेशन मंजुर |
|---|---|---|---|
| ६१ | ओवे | श्री. अक्षय अर्जुन म्हात्रे | लिपीक |
| ६२ | ओवे | श्री. तुषार भगवान भोपी | लिपीक |
| ६३ | पालेखुर्द | श्रीमती. निलम गणेश पाखुर्डे | लिपीक |
| ६४ | तलोजा पाचनंद | श्री. रामा लक्ष्मण भोवते | लिपीक |
| ६५ | तलोजा पाचनंद | श्री. अक्षय विष्णू केणी | लिपीक |
| ६६ | तोंडरे.नागझरी विभाग | श्री. राजेश ओमकारराव बागडे | लिपीक |
| ६७ | खिडूकपाडा | श्रीमती. प्रतिक्षा मच्छिंद्र पाटील | लिपीक |
| ६८ | खिडूकपाडा | श्रीमती. दर्शना लिलाधर म्हात्रे | लिपीक |
| ६९ | टेंभोडे | श्री. अमर रघुनाथ पाटील | लिपीक |
| ७० | पालेखुर्द | श्रीमती. शिल्पा शेखर साठे | शिपाई |
| ७१ | कामोठे | श्री. सचिन जनार्दन परदेशी | शिपाई |
| ७२ | आसुडगाव | श्री. निलेश जोमा म्हात्रे | शिपाई |
| ७३ | कळंबोली | श्री. गणेश तुळशीराम चौधरी | शिपाई |
| ७४ | कळंबोली | श्री. किरण कृष्णा टेंबे | शिपाई |
| ७५ | कळंबोली | श्री. संतोष भगवान पाटील | शिपाई |
| ७६ | कामोठे | श्री. विनोद रामभाऊ गोवारी | शिपाई |
| ७७ | तलोजा पाचनंद | श्री. राजेंद्र कमळाकर घबाडी | शिपाई |
| ७८ | तलोजा पाचनंद | श्रीमती. निता समाधान रेवसकर | शिपाई |
| ७९ | खारघर | श्री. गुरूनाथ भगवान सफरा | सफाई कामगार |
| ८० | खारघर | श्री. रमेश वालक्या पारधी | सफाई कामगार |
| ८१ | खारघर | श्री. अनंता आत्माराम पाटील | सफाई कामगार |
| ८२ | रोडपाली विभाग | श्री. तकदिर अशोक पाटील | सफाई कामगार |
| ८३ | कळंबोली | श्रीमती. रुपाली अमोल कुंभार | सफाई कामगार |
| ८४ | कळंबोली | श्री. विकी मेहपाल लोहरा | सफाई कामगार |
| ८५ | कामोठे | श्री. संजय सखाराम म्हात्रे | सफाई कामगार |
| ८६ | कामोठे | श्री. हरी महादेव म्हात्रे | सफाई कामगार |
| ८७ | रोहिंजन | श्री. दिनेश बाळाराम म्हात्रे | सफाई कामगार |
| ८८ | कळंबोली | श्री. ज्ञानेश्र्वर एकनाथ नाईक | सफाई कामगार |
| ८९ | पडघे विभाग | श्री. मंगळ्या रामा उघडा | सफाई कामगार |
| ९० | पडघे विभाग | श्री. बबन आत्माराम मधे | सफाई कामगार |

| अ.क्र | ग्रामपंचायतीचे नाव | कर्मचाऱ्याचे नाव | शैक्षणिक / तांत्रिक अर्हता विचारात घेऊन ज्या पदावर समावेशन मंजुर |
|---|---|---|---|
| ९१ | कामोठे | श्री. विकी रमेश चिमणे | सफाई कामगार |
| ९२ | कामोठे | श्री. विशाल पांडूरंग पाटील | सफाई कामगार |
| ९३ | कामोठे | श्री. प्रफ्फुल महादेव भगत | सफाई कामगार |
| ९४ | कामोठे | श्री. स्वनिल सुनिल भेंडे | सफाई कामगार |
| ९५ | कामोठे | श्री. दर्शन भरत परदेशी | सफाई कामगार |
| ९६ | खारघर | श्री. राजु अंबा दोरे | सफाई कामगार |
| ९७ | कामोठे | श्री. राकेश राजेश सुर्ते | सफाई कामगार |
| ९८ | कामोठे | श्री. रोशन नामदेव चिमणे | सफाई कामगार |
| ९९ | कामोठे | श्री. जिवन रमेश भेंडे | सफाई कामगार |
| १०० | कामोठे | श्री. विराज वसंत म्हात्रे | सफाई कामगार |
| १०१ | कामोठे | श्री. नयन जनार्दन गोवारी | सफाई कामगार |
| १०२ | कामोठे | श्री. निखील रघुनाथ म्हात्रे | सफाई कामगार |
| १०३ | कामोठे | श्री. कृष्णा आल्या म्हात्रे | सफाई कामगार |
| १०४ | रोहिंजन | श्री. शांताराम कालु तांबे | सफाई कामगार |
| १०५ | पडघे विभाग | श्रीमती. वंदना एकनाथ दरे | सफाई कामगार |
| १०६ | पडघे विभाग | श्रीमती. वनिता शांताराम कांबळे | सफाई कामगार |
| १०७ | नावडे विभाग | श्री. जनार्दन बाळु चौधरी | सफाई कामगार |
| १०८ | तलोजा पाचनंद | श्री. सुजित रघुनाथ पाटील | सफाई कामगार |
| १०९ | तलोजा पाचनंद | श्री. संदिप यशवंत खिरोट | सफाई कामगार |
| ११० | तलोजा पाचनंद | श्री. रियाजुल आयान मुल्ला | सफाई कामगार |
| १११ | तोंडरे.नागझरी विभाग | श्री. विश्वनाथ शांताराम पाटिल | सफाई कामगार |
| ११२ | वळवळी विभाग | श्री. हरिचंद्र लक्ष्मण पाटील | सफाई कामगार |
| ११३ | कोयनावेल | श्रीमती. सुनिता सुभाष कदम | बहु उद्देशिय कर्मचारी |
| ११४ | कळंबोली | श्री. सुरेश कृष्णा जळे | बहु उद्देशिय कर्मचारी |
| ११५ | रोहिंजन | श्री. जगदिश बबन म्हात्रे | बहु उद्देशिय कर्मचारी |
| ११६ | पडघे विभाग | श्री. निवृत्ती तुकाराम पाटील | बहु उद्देशिय कर्मचारी |
| ११७ | कोयनावेल | श्री. दिनकर बापुजी कदम | बहु उद्देशिय कर्मचारी |
| ११८ | पेणधर | प्रमोद चाहु नेरुळकर | बहु उद्देशिय कर्मचारी |
| ११९ | कालुद्रें | श्री. राकेश बळीराम परदेशी | बहु उद्देशिय कर्मचारी |
| १२० | खारघर | श्री. राम तुलशीराम पाटील | बहु उद्देशिय कर्मचारी |

| अ.क्र | ग्रामपंचायतीचे नाव | कर्मचाऱ्याचे नाव | शैक्षणिक / तांत्रिक अर्हता विचारात घेऊन ज्या पदावर समावेशन मंजुर |
|---|---|---|---|
| १२१ | कामोठे | श्री. परेश वासुदेव गोवारी | बहु उद्देशिय कर्मचारी |
| १२२ | खारघर | श्री. रवी प्रकाश ठाकूर | बहु उद्देशिय कर्मचारी |
| १२३ | कामोठे | श्री. मनोज परशुराम गोवारी | बहु उद्देशिय कर्मचारी |
| १२४ | कळंबोली | श्री. संदिप रविंद्र खानावकर | बहु उद्देशिय कर्मचारी |
| १२५ | घोट चाळ | श्री. गोपाळ धोंडू पाटिल | बहु उद्देशिय कर्मचारी |
| १२६ | तलोजा पाचनंद | श्री. अयुब म. सादिक पटेल | बहु उद्देशिय कर्मचारी |
| १२७ | तलोजा पाचनंद | श्री. समाधान परशुराम रेवसकर | बहु उद्देशिय कर्मचारी |
| १२८ | तलोजा पाचनंद | श्री. योगेश दिपक केणी | बहु उद्देशिय कर्मचारी |
| १२९ | तलोजा पाचनंद | श्री. किरण भालचंद्र पगडे | बहु उद्देशिय कर्मचारी |
| १३० | तलोजा पाचनंद | श्री. किशोर कमळाकर पाटील | बहु उद्देशिय कर्मचारी |
| १३१ | तोंडरे.नागझरी विभाग | श्री. जानु महादु तांबडे | बहु उद्देशिय कर्मचारी |
| १३२ | खिडूकपाडा | श्री. विश्वास अर्जुन  ठाकूर | बहु उद्देशिय कर्मचारी |
| १३३ | खिडूकपाडा | श्री. गजानन चंदर ठाकूर | बहु उद्देशिय कर्मचारी |
| १३४ | वळवळी विभाग | श्री. हरिचंद्र नामा पालेकर | बहु उद्देशिय कर्मचारी |
| १३५ | टेंभोडे | श्री. केशरीनाथ दिनकर भोईर | बहु उद्देशिय कर्मचारी |
| १३६ | टेंभोडे | श्री. महेंद्र उंदऱ्या गायकवाड | बहु उद्देशिय कर्मचारी |
| १३७ | पालेखुर्द विभाग | श्री. वासुदेव रामचंद्र कडु | बहु उद्देशिय कर्मचारी |
| १३८ | पालेखुर्द विभाग | श्री. एकनाथ किसन म्हत्रे | बहु उद्देशिय कर्मचारी |
| १३९ | कामोठे | श्री. शांताराम बंडू म्हात्रे | बहु उद्देशिय कर्मचारी |
| १४० | ओवे | श्री. गणेश विष्णू ठाकूर | बहु उद्देशिय कर्मचारी |
| १४१ | कळंबोली | श्री. सुरज सुरेश पाटील | लिपीक |
| १४२ | कळंबोली | श्री. दिलीप मोतीराम नाईक | सफाई कामगार |
| १४३ | कळंबोली | श्री. मंगेश मधुकर नाईक | सफाई कामगार |
| १४४ | ओवे | श्री. संतोष चंदर कातकरी | सफाई कामगार |
| १४५ | खारघर | श्री. जितेंद्र गंगाराम मढवी | स्वच्छता निरिक्षक |
| १४६ | खारघर | श्री. अनिल उत्तम कोकरे | कनिष्ठ अभियंता |
| १४७ | कळंबोली | श्रीम. निशा गजानन गायकवाड | संगणक  ऑपरेटर |
| १४८ | कळंबोली | श्री. किरण दिपक मोहिते | संगणक  ऑपरेटर |
| १४९ | कामोठे | श्री. प्रितम रमेश पाटिल | स्थापत्य अभियंता |
| १५० | खारघर | श्री. दत्ता भास्कर मधे | बहुउद्देशीय कर्मचारी |

| अ.क्र | ग्रामपंचायतीचे नाव | कर्मचाऱ्याचे नाव | शैक्षणिक / तांत्रिक अर्हता विचारात घेऊन ज्या पदावर समावेशन मंजुर |
|---|---|---|---|
| १५१ | खारघर | श्री. किशोर बुध्या पारधी | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १५२ | खारघर | श्री. रामनाथ विष्णु भगत | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १५३ | कोयनावेल | श्रीम. अरुणा चंद्रकांत कदम | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १५४ | कोयनावेल | श्रीम. लिलाबाई सुरेश गाडे | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १५५ | कळंबोली | श्री. सुनिल रघुनाथ नाईक | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १५६ | कळंबोली | श्री. गंग्या बबन नाईक | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १५७ | नावडे | श्री. सुरेश अंबो भगत | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १५८ | कळंबोली | श्री. विजय शिवराम नाईक | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १५९ | कळंबोली | श्रीम. हिरुबाई तु. कडव | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १६० | आसुडगाव | श्री. रविंद्र शंकर दळवी | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १६१ | आसुडगाव | श्री. संतोष सुदाम कातकरी | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १६२ | कळंबोली | श्री. दिलीप मोतीराम नाईक | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १६३ | कळंबोली | श्री. रमेश कमल्या नाईक | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १६४ | कळंबोली | श्री. कृष्णा सिताराम नाईक | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १६५ | कळंबोली | श्री. कैलाश नवश्या नाईक | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १६६ | कळंबोली | श्री. संतोष कृष्णा नाईक | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १६७ | पडघे | श्री. गोमा रामा मधे | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १६८ | पडघे | श्रीम. बुधीबाई शामा उघडा | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १६९ | पडघे | श्रीम. रामी गोमा पारधी | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १७० | खारघर | श्रीम. कविता चंद्रकांत कातकरी | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १७१ | कामोठे | श्री. भगवान काळुराम मुंडकर | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १७२ | ओवे | श्री. नागेश नामा मधे | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १७३ | कामोठे | श्री. रुपेश रामदास नाईक | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १७४ | कामोठे | श्री. धनु रोहीदास भगत | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १७५ | पडघे | श्रीम. कांता अनंता जाधव | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १७६ | पडघे | श्रीम. वनिता रोहिदास कांबळे | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १७७ | तोंडरे | श्री. रमेश खंडू पाटिल | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १७८ | तळोजा पाचनंद | श्रीम. अलका मनोहर जाधव | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १७९ | तळोजा पाचनंद | श्रीम. लिला चंद्रकांत जाधव | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १८० | तोंडरे | श्री. भगवान दिनकर पाटिल | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १८१ | तोंडरे | श्रीम. लिलाबाई राजाराम पाटिल | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १८२ | तोंडरे | श्री. अबांदास चंदर जाधव | बहुउद्देशीय कर्मचारी |
| १८३ | वळवली | श्री. राजेश महादेव पारधी | बहुउद्देशीय कर्मचारी |

## परिशिष्ट- ब

**शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक-पमपा-२२१७/प्र.क्र.४१२ (ब)/नवि-२३,**

### हमीपत्र

मी -------------, वय ------ राहणार ----------,-------- जिल्ह्यातील नव्याने स्थापन झालेल्या ------- महानगरपालिका संबंधित तत्कालीन भूतपूर्व ग्रामपंचायतीचा कर्मचारी आहे व सध्या ------ महानगरपालिका येथे कार्यरत आहे.

शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.पमपा-२२१७/प्र.क्र.४१२ (ब)/नवि-२३, दिनांक २३.११.२०२० नुसार राज्यातील नवनिर्मित नगरपरिषदा/नगरपंचायतीमध्ये तत्कालीन ग्रामपंचायतीच्या कर्मचाऱ्यांचे समावेशन करण्यासाठी मार्गदर्शक सूचना देण्यात आलेल्या आहेत.

दिनांक ०१.१०.२०१६ च्या शासन निर्णयान्वये नव्याने स्थापित पनवेल महानगरपालिकेच्या आस्थापनेवर समावेशनाच्या अनुषंगाने स्वेच्छेने हमीपत्र देत असून, शासन निर्णय दिनांक २३.११.२०२० अन्वये निर्गमित मार्गदर्शक तत्वे मला मान्य असून पनवेल महानगरपालिकेकरीता माझ्या सेवेच्या संदर्भात घेण्यात आलेले सर्व निर्णय मला मान्य आहेत. भविष्यात मी, यासंदर्भात कोणतेही आक्षेप घेणार नाही.

वर नमुद केलेल्या दिनांक २३.११.२०२० शासन निर्णयात नमूद केलेल्या अटी व शर्ती पुर्ण न केल्यास माझे करण्यात आलेले समावेशन रद्द करण्यात येईल व मी त्यानंतर इतर कोणत्याही पदावर समावेशनास पात्र राहणार नाही, याची मला जाणीव आहे. व त्यामुळे माझ्या होणाऱ्या नुकसानाची जबाबदारी माझी स्वत:ची असेल. तसेच याबाबत मला कुठलीही तक्रार किंवा मा.न्यायालयात दावा करण्याचा मला अधिकार राहणार नाही.

वरीलप्रमाणे हमीपत्र मी ------------ हे स्वत:च्या मर्जीने लिहून देत असून त्याआधारे माझे विहित अटी-शर्तीवर उपलब्ध रिक्त पदावर समावेशन करण्यात यावे.

**लिहून देणाऱ्याचे नाव व स्वाक्षरी**

**ठिकाण :-**

**दिनांक :-**

**प्रति,**

**आयुक्त,**
पनवेल महानगरपालिका,
पनवेल, जि.रायगड